**भारतीय दंड संहिता व फौजदारी प्रक्रिया संहिता (महाराष्ट्र सुधारणा) अधिनियम, २०१८ अन्वये भारतीय दंड संहिता, १८६० च्या कलम-३५३ (लोकसेवकाला त्याचे कर्तव्य पार पाडण्यापासून धाकाने परावृत्त करण्यासाठी हमला किंवा फौजदारी बलप्रयोग करणे) मधील सुधारणेच्या अनुषंगाने समिती गठीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.सुधारणा-१०१८/प्र.क्र.९८/विशा-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०५ जानेवारी, २०१९

**संदर्भ**:- महाराष्ट्र शासन राजपत्र दिनांक ०७/०६/२०१८

**प्रस्तावना:-**

सन २०१८ च्या द्वितीय अधिवेशनात दिनांक १९/०७/२०१८ रोजी "विधानमंडळ सदस्यांना त्यांची लोकांप्रती असलेली कर्तव्ये पार पाडण्यासाठी प्राप्त झालेल्या विशेषाधिकारांची कार्यकारी यंत्रणेकडून पायमल्ली होते तसेच शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांना भारतीय दंड संहितेच्या कलम-३५३ अन्वये संरक्षण दिले असल्याने त्यांच्या विधीमंडळ सदस्यांप्रती असलेल्या गैरवर्तनात वाढ झालेली आहे" असा मुद्दा विशेषाधिकारभंगाच्या माध्यमातून सभागृहात उपस्थित झाला होता. सदर चर्चेच्यावेळी भारतीय दंड संहिता व फौजदारी प्रक्रिया संहिता (महाराष्ट्र सुधारणा) अधिनियम, २०१८ अन्वये कलम ३५३ मध्ये शासकीय सेवकांशी गैरवर्तन करण्याबाबतच्या गुन्ह्यास दोन वर्षाऐवजी पाच वर्षांची शिक्षा असल्याने त्यास आक्षेप नोंदवून त्याचा पुनर्विचार करुन त्यामध्ये सुधारणा करण्याची मागणी करण्यात आली. सदर मागणीच्या अनुषंगाने मा.मुख्यमंत्री महोदयांनी दोन्ही सभागृहाच्या सदस्यांची समिती गठीत करण्याबाबत सभागृहास आश्वासन दिले. त्यानुसार समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असून त्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

भारतीय दंड संहिता, १८६० च्या कलम ३५३ (लोकसेवकाला त्याचे कर्तव्य पार पाडण्यापासून धाकाने परावृत्त करण्यासाठी हमला किंवा फौजदारी बलप्रयोग करणे) मधील शिक्षेमध्ये भारतीय दंड संहिता व फौजदारी प्रक्रिया संहिता (महाराष्ट्र सुधारणा) अधिनियम, २०१८ अन्वये दोन वर्षाऐवजी पाच वर्षांची शिक्षा अशी सुधारणा करण्यात आली आहे. सदर सुधारणेस विधीमंडळ सदस्यांनी आक्षेप नोंदविल्याने त्यात बदल/सुधारणा करण्याबाबत निर्णय घेण्याकरीता

मा.मुख्यमंत्री महोदयांनी सभागृहास आश्वासित केल्यानुसार खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मा.मुख्यमंत्री | - | अध्यक्ष |
| २) | मा.मंत्री, संसदीय कार्य | - | सदस्य |
| ३) | मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा | - | सदस्य |
| ४) | मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद | - | सदस्य |
| ५) | मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) | - | सदस्य |
| ६) | मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) | - | सदस्य |
| ७) | मा.श्री.अजित पवार, विधानसभा सदस्य | - | सदस्य |
| ८) | मा.श्री.सुनिल प्रभु, विधानसभा सदस्य | - | सदस्य |
| ९) | मा.श्री.शरद रणपिसे, विधानपरिषद सदस्य | - | सदस्य |
| १०) | मा.श्री.अनिल परब, विधानपरिषद सदस्य | - | सदस्य |
| ११) | प्रधान सचिव (विधी व न्याय) | - | सदस्य |
| १२) | अपर मुख्य सचिव (गृह) | - | सदस्य सचिव |

सदर सभागृहातील चर्चेत भाग घेतलेले सदस्य, पोलिस महासंचालक व अन्य अधिकारी यांना आवश्यकतेनुसार “निमंत्रित सदस्य” म्हणून बोलविण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या कालावधीत समिती आपला निर्णय शासनास सादर करील.

३. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०१०५१२१८११००२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2019.01.07 11:57:22 +05'30'

**( किशोर भालेराव )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.श्री.अजित पवार, विधानसभा सदस्य

२) मा.श्री.सुनिल प्रभु, विधानसभा सदस्य

३) मा.श्री.शरद रणपिसे, विधानपरिषद सदस्य

४) मा.श्री.अनिल परब, विधानपरिषद सदस्य

५) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.

६) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.

७) पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८) मा.मंत्री, संसदीय कार्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

९) मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

१०) मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

११) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

१३) अपर मुख्य सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१४) प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१५) प्रधान सचिव (विधी व न्याय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

१६) निवडनस्ती, विशा-९ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२